# देवीची आरती

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारी अनाथ नाथे अंबे करूणा विस्तारी
वारी वारी जन्म मरणांते वारी हारी पडलो आता संकट नीवारी

जय देवी जय देवी जय महिषासुर मथिनी सुरवर ईश्वरवरदे तारक
संजिवनी .. जय देवी जय देवी .धृ.

त्रिभुवनी भुवनी पाहता तुज ऐसी नाही चारी श्रमले परंतु न बोलवे कांही
साही विवाद करिता पडीलो प्रवाही ते तु भक्तांलागी पाविसि लवलाही ...1
.. जय देवी जय देवी जय महिषासुर.....

प्रसन्न वदने प्रसन्न होसी निजदासा क्लेशांपासुनि सोडी तोडी भवपाशा
अंबे तुजवांचून कोण पुरविल आशा नरहरि तल्लिन झाला पदपंकजलेशा ...2
.. जय देवी जय देवी जय महिषासुर.....